राज्याची सामायिक सुविधा निर्माण करण्याकरीता उद्योग समूह प्रकल्पांना अनुदान योजनेंतर्गत राज्य शासनाच्या आर्थिक सहभाग अनुदानाची मर्यादा सुधारीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्र. एमएसई-२०२२/ प्र.क्र.२०१/ उद्योग-७**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक २५/०४/२०२३

**संदर्भ :-**
१. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एसएमई-२००९/ २२९/ उद्योग-७, दिनांक ०९/०६/२००९
२. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. एसएमई -२०१०/ १०१७/ उद्योग-७, दिनांक २२/१०/२०२२
३. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. एसएमई -२०१०/ प्र.क्र.१०१७/ उद्योग-७, दिनांक ०२/०६/२०१५
४. केंद्रीय सूक्ष्म, लघू व मध्यम उपक्रम मंत्रालय, भारत सरकार यांच्या नवीन मार्गदर्शक सूचना दिनांक २४/०५/२०२२ व दिनांक २६/०७/२०२२.
५. उद्योग सह संचालक (औसशा), उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/औसशा/ MSE-CDP/ State Contribution/ २०२२/ अे-११७३, दिनांक १८/१०/२०२२.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या सूक्ष्म, लघू उपक्रम-समूह विकास योजनेंतर्गत (MSE-CDP) मंजूर औद्योगिक समूह प्रकल्पांना केंद्र शासनाच्या प्रकल्प मंजूरीच्या अनुसार आर्थिक सहाय्य होणेसाठी तसेच प्रकल्पाच्या किफायतशीरपणामध्ये वाढ होणेसाठी "राज्याची सामायिक सुविधा निर्माण करण्याकरीता उद्योग समूह प्रकल्पांना अनुदान योजना" दिनांक ०९/०६/२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आली आहे. तसेच दिनांक २२/१०/२०१० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये राज्य शासनाचे आर्थिक सहभागासंबंधी अनुदानाची कमाल मर्यादा निश्चित करण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाचे अनुदान रुपये १५ कोटी प्रकल्प किमतीच्या मर्यादेत मंजूर करण्यात येत होते. त्यानुसार प्रकल्प किमतीच्या १०% म्हणजेच रुपये १.५ कोटी इतकी राज्य शासनाची अनुदान मर्यादा निश्चित करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने राज्यातील सूक्ष्म व लघू उपक्रमांच्या सर्वांगिण विकासासाठी केंद्र शासनाच्या MSE-CDP योजनेची अंमलबजावणी उद्योग विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयामार्फत सन २०१० पासून राज्यात व्यापक प्रमाणात करण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाकडून दिनांक २४/०५/२०२२ व दिनांक २६/०७/२०२२ रोजीच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांनुसार MSE-CDP योजनेमध्ये सुधारणा करण्यात आल्या असून त्या धर्तीवर राज्य शासनाकडून निर्धारीत करण्यात आलेल्या सहभाग अनुदानामध्ये प्रवर्गनिहाय आवश्यक सुधारणा करण्याबाबत दिनांक १८/१०/२०२२ रोजीच्या पत्रान्वये उद्योग संचालनालयाकडून प्रस्तावित करण्यात आले आहे. यासंदर्भात मा. लोकप्रतिनिधी व स्टेकहोल्डर्सकडून विभागास प्राप्त झालेली निवेदने तसेच उद्योग संचालनालयाकडून प्रस्तावित केल्यानुसार,

"राज्याची सामायिक सुविधा निर्माण करण्याकरीता उद्योग समूह प्रकल्पांना अनुदान योजना (२८५१ ५४०६)" अंतर्गत राज्य शासनाकडून निर्धारीत करण्यात आलेल्या सहभाग अनुदानामध्ये केंद्र शासनामार्फत प्रवर्गनिहाय करण्यात आलेल्या सुधारणांशी अनुरुप बदल करण्यासंदर्भात मा. मुख्य सचिव महोदय यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीची बैठक दिनांक ०३/०२/२०२३ रोजी संपन्न झाली. सदर बैठकीत उच्चस्तरीय समितीने घेतलेल्या निर्णयानुसार राज्याची सामायिक सुविधा निर्माण करण्याकरीता उद्योग समूह प्रकल्पांना अनुदान योजनेंतर्गत राज्य शासनाच्या आर्थिक सहभाग अनुदानाची मर्यादा सुधारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

केंद्र शासनाकडून दिनांक २४/०५/२०२२ व दिनांक २६/०७/२०२२ रोजीच्या नवीन मार्गदर्शक सूचनांनुसार सूक्ष्म, लघू उपक्रम-समूह विकास योजनेमध्ये (MSE-CDP) केलेल्या सुधारणांच्या धर्तीवर "राज्याची सामायिक सुविधा निर्माण करण्याकरीता उद्योग समूह प्रकल्पांना अनुदान योजना (२८५१ ५४०६)" अंतर्गत राज्य शासनाच्या आर्थिक सहभाग अनुदानाबाबत खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत:-

| अ क्र | CFC प्रकल्प किंमत | सर्वसाधारण प्रवर्गातील औद्योगिक समूह प्रकल्पांसाठी राज्य शासनाचे सहभाग अनुदान (उच्चतम अनुदान मर्यादा) | आकांक्षित जिल्ह्यातील तसेच ज्या औद्योगिक समूहामध्ये ५०% सूक्ष्म, महिला, ग्रामीण किंवा अनुसूचित जाती/ जमातीचे उद्योग घटक असतील अशा औद्योगिक समूह प्रकल्पांसाठी राज्य शासनाचे सहभाग अनुदान (उच्चतम अनुदान मर्यादा) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | रुपये ५ कोटी ते १० कोटी | २०%<br>(रुपये २ कोटी) | १५%<br>(रुपये १.५ कोटी) |
| २ | रुपये १० कोटी ते ३० कोटी | २०%<br>(रुपये ६ कोटी) | १५%<br>(रुपये ४.५ कोटी) |

२. वरील तक्त्यातील सुधारणा या राज्याची सामायिक सुविधा निर्माण करण्याकरीता उद्योग समूह प्रकल्पांना अनुदान योजनेअंतर्गत दिनांक ०१/०४/२०२३ पासून प्राप्त होणा-या प्रस्तावांकरीता लागू राहतील.

३. सूक्ष्म, लघू उपक्रम-समूह विकास योजना (MSE-CDP) तसेच राज्याची सामायिक सुविधा निर्माण करण्याकरीता उद्योग समूह प्रकल्पांना अनुदान योजनेसंदर्भात राज्यातील अंमलबजावणीबाबत, वरील तक्त्यातील सुधारणा वगळता, यापूर्वी निश्चित करण्यात आलेल्या तरतूदी कायम राहतील.

४. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाने अनुक्रमे दिनांक २८/११/२०२२ व दिनांक ०५/१२/२०२२ रोजी दिलेल्या अभिप्रायानुसार, मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीने

दिनांक ०३/०२/२०२३ रोजी संपन्न बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार शासन मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०४२५१३२०२५०७१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY SHAMKANT DEGAONKAR

Digitally signed by SANJAY SHAMKANT DEGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=56CF8C8577584ADC42F070185C585C41084CC34F6683553D21CCACBFA33D4D1F, cn=SANJAY SHAMKANT DEGAONKAR
Date: 2023.04.26 17:13:02 +05'30'

**(संजय देगांवकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. विरोधीपक्ष नेते, विधान परिषद व विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२) राज्यातील सर्व सन्माननीय संसद सदस्य.
३) सर्व सन्माननीय विधानसभा व विधानपरिषद सदस्य.
४) मा. राज्यपाल महोदयांचे सचिव.
५) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव.
६) मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे सचिव.
७) मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.
८) मुख्य सचिव यांचे उप सचिव.
९) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-३२.
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई-९३.
१३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१६) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
१७) सर्व विभागीय उद्योग सह संचालक (उद्योग संचालनालयामार्फत).
१४) सर्व महाव्यवस्थापक जिल्हा उद्योग केंद्र (उद्योग संचालनालयामार्फत).
१५) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१६), मंत्रालय, मुंबई -३२.
१६) नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई - ३२.
१७) अवर सचिव (कार्यासन प्रशासन- १), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१८) निवडनस्ती (उद्योग-७).